केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत सर्वसाधारण योजनेतून सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून २२१०५२४६ या लेखाशिर्षातून राज्य हिश्श्यातील Infrastructure & Maintenance या घटकाकरिता चे रु.३०७२८.९८ लक्ष इतके राज्य हिश्श्याचे अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः बियुडी -१३२५/प्र.क्र.३०७/एनएचएम (संगणक क्र.११७४६९७)

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २० जून, २०२५

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दिनांक ०७ एप्रिल, २०२५.

२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय, दि.०५.१२.२०२३

३) केंद्र शासनाचे मंजूरी आदेश G.२७०१७/४(१३)/२०१३-NHM- Finance/FTS-३१५०३८४ दिनांक १३/०६/२०२५

४) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ Infra राहि/२७९९०-९९७/२०२५-२६, दिनांक १६.०६.२०२५ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाहय, परवडयाजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या अनुषंगाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल, २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले आहे. सदर योजनेअंतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रम (Reproductive child Health), नियमित लसीकरण, मिशन प्लेक्सीपुल, पायाभूत सुविधांचे बळकटीकरण व पल्स पोलिओ लसीकरण इत्यादी आरोग्य सेवा देण्यात येतात. त्या अनुषंगाने वाचा अनुक्रमांक ४ येथील संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या दि. १६.०६.२०२५ रोजीच्या पत्रास अनुसरून राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रम करीता

सर्वसाधारण (General) वर्गवारीतून Infrastructure & Maintenance या घटकासाठी सन २०२५-२६ च्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून रू. ३०७२८.९८ लक्ष इतके राज्य हिश्श्याचे अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य कार्यक्रमाकरीता सर्वसाधारण वर्गवारीतून (General) Infrastructure & Maintenance या घटकाकरिता सन २०२५-२६ मधील ४०% राज्य हिश्श्यातील वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील परिपत्रकानुसार निधी वितरीत करण्यात मान्यता देण्यात आली आहे. सदरचा राज्य हिस्सा वितरीत करण्याकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी लेखाशिर्ष २२१०५२४६,३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) अंतर्गत रु.७००.०० कोटी इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यात आलेली आहे. तरी, उपलब्ध तरतूदीमधून Infrastructure & Maintenance या घटकाकरिता रू. ३०७२८.९८ लक्ष इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीस वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सह संचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना "नियंत्रण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर प्रस्तावावरील खर्च खालीलप्रमाणे नमूद लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२५-२६ साठी मंजूर करण्यात आलेल्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

| अ. क्र. | तपशिल | (रु.लाखात) | | |
|---|---|---|---|---|
| | | लेखाशिर्ष | अर्थसंकल्पीय तरतूद | वितरीत करावयाची |

| | | | | रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | आर-१, २२१० वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०६, सार्वजनिक आरोग्य, ८०० इतर खर्च, सर्वसाधारण योजना (०१)(१५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, केंद्र पुरस्कृत योजना, (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | २२१०५२४६ | ७००००.०० | ३०७२८.९८ |

४. वित्त विभागाच्या दिनांक ०७ एप्रिल, २०२५ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ०७ एप्रिल, २०२५ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि/-२०२२/प्र.क्र.-२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

५. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

६. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

७. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

८. सदर अनुदान सशर्त असून या पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

९. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१०. प्रस्तुत शासननिर्णय वित्त विभाग परिपत्रक दिनांक ०७.०४.२०२५ मधील तरतूदींच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६२०१०११३४३७१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL SAWARE

Digitally signed by ANIL SAWARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=073348b7a8767f0f7865422df1e65ce2f3bcdf6786e4712e2c088a9ac4ffee3f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1C7875BFBCCDB94828A5028954F06ED28EC75FD43053DB3AE8254FA5A5D14A57, cn=ANIL SAWARE
Date: 2025.06.20 12:43:30 +05'30'

**( अनिल वि. सावरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.

१०.कार्यासन अर्थसंकल्प व लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
११.निवडनस्ती ( एनएचएम) .